**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण यांच्या कार्यक्षेत्रातील साल्हेर, ता.सटाणा, जि.नाशिक येथील मुख्य इमारतीच्या डावी व उजवीकडची दुरुस्ती, स्वच्छतागृहाची दुरुस्ती, कर्मचारी निवासस्थान दुरुस्ती तसेच मुलींच्या वसतिगृहाच्या दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.८०/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ५ फेब्रुवारी, २०१०.

**वाचा** :- आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.इमादु-०९/प्र.क्र.२०/का.८(३), दिनांक २०.१.२०१०.

**शासन निर्णय** : प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, साल्हेर, ता.सटाणा, जि.नाशिक येथील मुख्य इमारतीच्या डावी व उजवीकडची दुरुस्ती, स्वच्छतागृहाची दुरुस्ती, कर्मचारी निवासस्थान दुरुस्ती तसेच मुलींच्या वसतिगृहाची दुरुस्ती अशा एकूण रु.२०,२५,०५४/- इतक्या रकमेची पाच अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेसाठी सादर करण्यात आली आहेत.

२. सदर अंदाजपत्रके संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केली असून उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, सटाणा यांनी तपासली आहेत. तसेच उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, सटाणा व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक यांनी साक्षांकित केली आहेत.

३. सदर अंदाजपत्रके सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहेत. सदर काम दुरुस्तीचे असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या दुरुस्तीच्या खालील अंदाजपत्रकांना २ ते ४% कॉन्टीजन्सी चार्जेस वगळून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कामाचा तपशील | अंदाजपत्रकीय रक्कम |
|---|---|---|
| १ | मुख्य इमारतीच्या मधल्या भागातील वर्गखोल्यांची दुरुस्ती | रु.४,९०,१९८/- |
| २ | मुख्य इमारतीच्या डाव्या व उजव्या बाजूची दुरुस्ती | रु.४,४३,८१०/- |
| ३ | स्वच्छतागृहाची दुरुस्ती | रु.२,०५,५७३/- |
| ४ | कर्मचारी निवासस्थानाची दुरुस्ती | रु.३,८०,४७५/- |
| ५ | मुलींच्या वसतिगृहाची दुरुस्ती | रु.४,४८,७७७/- |
| | **एकूण** | **रु. १९,६८,८३३/-** |

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करण्यात यावे.

५. सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००२०५१४३२५८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, सटाणा.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

F:\DESK 13\2010C.R.80 - 10.lwp